महाराष्ट्र शासन

गृह विभाग

शासन ज्ञापन क्र. दुरुस्ती-०११९/प्र.क्र.१७३/पोल-७.

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.

दिनांक ०५ नोव्हेंबर २०१९.

विषय :- पोलीस अधीक्षक, सोलापूर (ग्रामीण), यांच्या आस्थापनेवरील कवितानगर पोलीस वसाहतीमधील गट क्र. बी-१ ते बी-७१ यांमधील ३९ सेवा निवासस्थानांच्या दुरुस्तीसाठी प्रशासकीय मान्यता मिळण्याबाबत.

संदर्भ :-
1) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१४/ प्र.क्र.४९/ १४/ विनियम, दिनांक ०५.०१.२०१५.
2) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.
3) पोलीस महासंचालक, म.रा., मुंबई, यांचे पत्र क्र. पोमसं/ १९-ए/ विपोमनि-कोल्हापूर-परिक्षेत्र/ दुरुस्तीचे-प्रस्ताव/६१/ २०१९, दिनांक ०५.०७.२०१९.

ज्ञापन.

पोलीस महासंचालक, म.रा., यांच्या कार्यालयाने पोलीस अधीक्षक, सोलापूर (ग्रामीण), यांच्या आस्थापनेवरील कवितानगर पोलीस वसाहतीमधील गट क्र. बी-१ ते बी-७१ यांमधील ३९ सेवा निवासस्थानांच्या दुरुस्तीसाठी रु.८,०८,३७,०००/- इतक्या खर्चाच्या अंदाजास प्रशासकीय मान्यता मिळणेबाबतचा प्रस्ताव सादर केला आहे.

२. उक्त खर्चाचे अंदाज हे उप अभियंता, उत्तर सोलापूर सा.बां. उपविभाग, यांनी सन २०१८-१९ च्या दरसूचीनुसार तयार केले असून ते कार्यकारी अभियंता, सा.बां. विभाग, सोलापूर, यांनी साक्षांकित केले आहेत.

३. उक्त खर्चाचे अंदाज हे सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, यांनी तपासले आहेत व त्या प्रमाणे, विवक्षित अटींवर, प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यास सहमती दिली आहे.

४. त्या अनुसार, पोलीस अधीक्षक, सोलापूर (ग्रामीण), यांच्या आस्थापनेवरील कवितानगर पोलीस वसाहतीमधील गट क्र. बी-१ ते बी-७१ यांमधील ३९ सेवा निवासस्थानांच्या दुरुस्तीसाठी रु.८,०८,३७,०००/- *(रुपये आठ कोटी, आठ लक्ष, सदतीस हजार फक्त)* इतक्या खर्चाच्या अंदाजास, पुढील अटींवर, याद्वारे, प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

1) विशेष पोलीस महानिरीक्षक, कोल्हापूर परिक्षेत्र, कोल्हापूर, यांनी खर्चाचे अंदाज साक्षांकित करणे आवश्यक आहे.
2) निधी उपलब्ध झाल्याशिवाय काम सुरु करु नये.

५. उक्त कामासाठी येणारा खर्च हा गृह विभाग--मागणी क्र. बी-१, २०५५, पोलीस, (००) १०९, जिल्हा पोलीस, (००)(०१) जिल्हा पोलीस बल (२०५५ ०१६८) (अनिवार्य)(दत्तमत), २७-लहान बांधकामे, याखाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

६. हे ज्ञापन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४१६/१९/इमा.-२, दिनांक १८.०९.२०१९, अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७. हे ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या *www.maharashtra.gov.in* या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०१९११०५११५१५१६९२९ असा आहे. हे ज्ञापन डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SWAPNIL
GOPAL BORSE

Digitally signed by SWAPNIL GOPAL BORSE
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=c6a6e7cad855fc787a96e36f11fbc87a9f66cfd9bad0118449
3f2735ad885627, postalCode=400032, street=2ND
FLOOR,MANTRALAYA,MADAME CAMA MARG,MUMBAI,
serialNumber=8538cd1e408948f7d025537d5f6589bd8958d1b9532
2e66d2cc5edf89ad0d79e, ou=HOME DEPT, o=GOVERNMENT OF
MAHARASHTRA, cn=SWAPNIL GOPAL BORSE
Date: 2019.11.05 11:53:27 +05'30'

(स्वप्नील गोपाल बोरसे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१) पोलीस महासंचालक, म.रा., मुंबई.
२) विशेष पोलीस महानिरीक्षक, कोल्हापूर परिक्षेत्र, कोल्हापूर.
३) पोलीस अधीक्षक, सोलापूर (ग्रामीण).

प्रत-

१) कार्यकारी अभियंता, सा.बां. विभाग, सोलापूर.
२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
४) जिल्हा कोषागार अधिकारी, सोलापूर.
५) कार्यासन अधिकारी (इमा.-२), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) कार्यासन अधिकारी (व्यय-७/ विनियम), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) निवड फाईल (पोल-७).